शासनाच्या स्टँड अप इंडिया योजनेत अनुसूचित जाती व नवबौध्द समाजाच्या घटकांकरीता मार्जिन मनी उपलब्ध करुन देणे या योजनेंतर्गत सन २०२४-२५ या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेला निधी खर्च करण्यासाठी मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक: मासाका-२०२४/प्र.क्र.७७७/अजाक**
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २७ मार्च, २०२५.

वाचा : शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक २५ जुलै, २०२४.

ज्ञापन :

आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना कळविण्यात येत आहे की, केंद्र शासनाच्या स्टँड अप इंडिया योजनेत अनुसूचित जाती व नवबौध्द समाजाच्या घटकांकरीता मार्जिन मनी उपलब्ध करुन देण्यासाठी (लेखाशीर्ष २२२५ एफ ३१६) सन २०२४-२५ या वर्षातील अर्थसंकल्पित तरतुदीपैकी उपरोक्त वाचा येथील शासन परिपत्रकाच्या अनुषंगाने वित्त विभागाने अर्थसंकल्पिय अंदाज, वाटप आणि संनियंत्रण प्रणालीवर (बीम्स/BEAMS) उपलब्ध करुन दिलेला निधी खर्च करण्यासाठी या ज्ञापनाद्वारे वितरीत करण्यात येत आहे, याबाबतचे विवरण खालीलप्रमाणे आहे:

(रुपये लाखात)

| अ. क्र. | केंद्र शासनाच्या स्टँड अप इंडिया योजनेत अनुसूचित जाती व नवबौध्द समाजाच्या घटकांकरीता मार्जिन मनी उपलब्ध करुन देणे | सुधारित अंदाज रुपये | खर्च करण्यासाठी मान्यता देण्यात येत असलेला निधी रुपये |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | २२२५,<br>३३, अर्थसहाय्य<br>२२२५ एफ ३१६ | २५०.००<br>(रुपये दोनशे पन्नास लक्ष फक्त) | ६६.००<br>(रुपये सहासष्ट लक्ष फक्त) |

२. सदर निधी थेट लाभ हस्तांतरणाद्वारे (DBT) लाभार्थ्यांच्या बँक खात्यामध्ये जमा करण्यात यावा.

३. सदर निधी खर्च करण्यासाठी आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. नियंत्रण अधिकारी यांनी उपरोक्त विवरणातील रकाना ४ मधील निधी खर्च करावा. सदर निधी खर्च झाल्यावर त्याबाबतचे विवरण व उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास सादर करण्यात यावे.

५. प्रस्तुत योजनेवर होणारा खर्च खालील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून सन २०२४-२५ या वर्षात अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा:

मागणी क्रमांक एन-३
मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक
यांचे कल्याण
०१, अनुसूचित जातींचे कल्याण
७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना
(०६) स्टँड अप इंडिया योजना
(०६)(०१) अनुसूचित जाती व नवबौध्द नवउद्योजकांना अर्थसहाय्य देणे (अ.जा.उ.यो.)
३३, अर्थसहाय्य
२२२५ एफ ३१६

६. नियंत्रण अधिकारी यांनी खर्च करताना उपरोक्त वाचा येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक २५ जुलै, २०२४मधील प्रत्येक बाबींची पूर्तता करण्याची दक्षता घ्यावी. तसेच, वित्तीय अधिकारांतर्गत महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिकेत विहित केलेल्या अटींनुसार सदर निधी खर्च करताना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही, याची दक्षता घेण्याची जबाबदारी नियंत्रण अधिकारी यांची राहिल. सदर निधी वितरीत करताना आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उपयोगिता प्रमाणपत्रे तपासणीच्या अधिन राहून निधी वितरीत करावा.

७. सदर शासन ज्ञापन उपरोक्त वाचा येथील शासन परिपत्रकान्वये विभागास प्राप्त अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०३२७१४४११०३७२२ असा आहे. हे ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN VILAS SHISHUPAL

Digitally signed by PRAVIN VILAS SHISHUPAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=e90b1f238d671a8222f53575baf1f02e1625f1f53f35c695b531bcd5b6b83fa, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CBD05D0EA86861C0C1248FD89817636DDFBE5E50BA12759A0FE7E022D790310B, cn=PRAVIN VILAS SHISHUPAL
Date: 2025.03.27 14:42:56 +05'30'

**(प्रविण शिशुपाल)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, सर्व.

**प्रत,**

१. प्रादेशिक उप आयुक्त, समाज कल्याण विभाग, सर्व.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
४. महालेखापाल (लेखापरिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
६. संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प/विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती /अजाक.